पुणे, गडचिरोली, जालना व नांदेड येथील जिल्हा रुग्णालयामध्ये नवीन कार्डियाक कॅथलॅब स्थापन करण्याकरीता कामाच्या अंदाजपत्रक व आराखड्यांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः प्रशामा २०२२/प्र.क्र.४८/आरोग्य ३**
१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : २३ फेब्रुवारी, २०२२.

**वाचा :**

१) आरोग्य सेवा संचालनालय, राष्ट्रीय असंसर्गजन्यरोग नियंत्रण कार्यक्रम यांचे पत्र क्रमांक : संआसे/NCD/कार्डीयक लॅब स्थापना/१३४६३-६६/२०२२, दिनांक २३.०२.२०२२.

**प्रस्तावना :**

मा.वित्त मंत्री यांच्या दि. ०८ मार्च,२०२१ च्या अर्थसंकल्पीय भाषणामध्ये कार्डीयाक कॅथलॅब स्थापन करण्याचा मुद्या क्रमांक ४ समावेश आहे. त्याप्रमाणे पुणे, गडचिरोली, जालना व नांदेड येथील जिल्हा रुग्णालयामध्ये नवीन कार्डियाक कॅथलॅब स्थापन करण्याकरीता बांधकामाच्या व यंत्रसामुग्रीच्या कामाचे रु.३२,२३,२०,०००/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रक व नकाशांना प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्याबाबत पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय :**

2. पुणे, गडचिरोली, जालना व नांदेड येथील जिल्हा रुग्णालयामध्ये नवीन कार्डियाक कॅथलॅब स्थापन करण्याकरीता रु.३२,२३,२०,०००/- इतक्या रक्कमचे अंदाजपत्रक सहसंचालक, आरोग्य सेवा (असंसर्गजन्यरोग),मुंबई यांच्याकडून प्राप्त झाले आहे. सदर रु.३२,२३,२०,०००/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रक व आराखड्यांना खालील प्रमाणे त्या खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | कामाचे नाव | रक्कम |
|---|---|---|
| 1 | Constructing Cardiac Cathlab Civil work in Pune, Gadchiroli, Jalna and Nanded District Hospital. | Rs. ६,००,००,०००/- |
| 2 | Instruments and Equipment in Cardiac Cathlab - Pune, Gadchiroli, Jalna and Nanded District Hospital. | Rs. २६,२३,२०,०००/- |
| | एकूण | Rs. ३२,२३,२०,००० -/ |

**<u>अटी व शर्ती</u> :-**

१) कामासाठी निविदा मागविण्यापूर्वी सदर कामास मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांची तांत्रिक मंजुरी घेणे आवश्यक राहील.

२) बांधकामासाठी उपलब्ध होणाऱ्या नियतव्ययामधून सदर कामास निधी उपलब्ध करुन देण्याच्या अटीच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

३) कामासाठीच्या जागेची उपलब्धता, योग्यता व जागा पुरेशी आहे किंवा नाही याबाबतची खात्री संबंधित आरोग्य संस्था प्रमुखांनी करावी.

४) क्षेत्रिय जागेच्या परिस्थितीनुसार व आरोग्य संस्थांच्या आवश्यकतेनुसार प्रस्तावित कामाची किंमत वाढणे शक्य असल्यामुळे त्यासाठी आवश्यक प्रस्ताव सार्वजनिक बांधकाम विभागाच्या त्यात्या- भागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांची मान्यता घेण्यात यावी.

५) सदरचे अंदाजपत्रक हे ढोबळ नमुना अंदाजपत्रक असल्याने, या कामांच्या सविस्तर अंदाजपत्रकांना तांत्रिकदृष्ट्या मान्यता ही सार्वजनिक बांधकाम खात्याच्या त्यात्या- क्षेत्राच्या सक्षम अधिकाऱ्यांकडून करण्यात येईल.

६) स्थानिक ग्रामीण नगर विकास संस्थेच्या संबंधित नियमानुसार बांधकाम परवानगी तसेच भोगवटा प्रमाणपत्र मिळविण्याची जबाबदारी सार्वजनिक बांधकाम विभाग यांची राहील.

७) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१ दि. १० जानेवारी,२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

३. पुणे, गडचिरोली, जालना व नांदेड येथील जिल्हा रुग्णालयामध्ये नवीन कार्डियाक कॅथलॅब स्थापन करण्याकरीता बांधकावरील कामाचा खर्च मागणी क्रमांक- एच- ८, मुख्यलेखाशिर्ष "४२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य सेवा यावरील भांडवली खर्च, ०१- नागरी आरोग्य सेवा (वैद्यकीय सहाय्य)- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- इमारती, ११०- रुग्णालय व दवाखाने, (१)(अ) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- इमारती, (००)(०१) मोठी बांधकामे (४२१०००१४), ५३- मोठी बांधकामे" याखाली भागविण्यात येईल. त्याचप्रमाणे यंत्रसामुग्रीवरील खर्च मागणी क्रमांक- एच- ८, मुख्यलेखाशिर्ष "२२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१- नागरी आरोग्य सेवा (विषम चिकित्सा) ११०-७ पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना, (०६)(०१)-मुफसल क्षेत्रातील अध्यापन्नेतर शासकिय रुग्णालये व दवाखाने, १३- कार्यालयीन खर्च व ५२ -यंत्रसामुग्री व साधनसामुग्री (२२१० ०२२६)" याखाली भागविण्यात येईल.

४. पुणे, गडचिरोली, जालना व नांदेड येथील जिल्हा रुग्णालयामध्ये नवीन कार्डियाक कॅथलॅब स्थापन करण्याकरीता बांधकावरील कामाचा लागणाऱ्या रकमेची अर्थसंकल्पात तरतूद (पुरवणी मागणीव्दारे) करण्याचा प्रस्ताव आयुक्त, आरोग्य सेवा, मुंबई यांनी त्वरीत शासनास सादर करावा.

५. हे आदेश शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक- विअप्र २०१३/प्र.क्र.३०/विनियम, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्ट, भाग पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक-१, परिच्छेद क्रमांक- १३४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२१८१५४१५६७४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=685cbbb5899027ea29d44ae02d12f2c1313143ad8376755d0e815a1eb20fd0ce, cn=Roshani Dinesh Kadam Patil
Date: 2022.02.23 17:50:48 +05'30'

(रो.दि.कदम-पाटील)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र- १/ २ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
३. संनियंत्रक तथा मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अमरावती.
४. सह संचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये), मुंबई.
५. उप संचालक, आरोग्य सेवा मंडळ, पुणे,नागपूर,औरंगाबाद,लातूर
६. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, पुणे,गडचिरोली, जालना व नांदेड.
७. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे,गडचिरोली, जालना व नांदेड
८. जिल्हा कोषागार अधिकारी, जि. पुणे,गडचिरोली, जालना व नांदेड
९. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
१०. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवडनस्ती (आरोग्य-३).